# उडणारी जादूची कार





# उडणारी

# जादूची कार

# चिट्टी-चिट्टी

# बैंग-बैंग

# ची गोष्ट

मराठी : अश्विनी बर्वे

जेह्मी पॉट आणि तिची बहिण जेमिमा, स्वयंपाक घरात होते.
मिसिज़ पॉट सैंडविच करत होत्या.
त्यांना बाहेरचा कल्हा ऐकू आला.
तो बघण्यासाठी त्या बाहेर आल्या.



आवाज एका मोठ्या विशाल गाडीचा होता. श्री पॉट त्यात बसलेले होते.

“ही कार मला भंगार बाजारात मिळाली. ”श्री पॉट म्हणाले, “या गाडीत या, मी तुम्हांला गाडीतून सैर करून आणतो.



कार मध्ये कितीतरी प्रकारची बटणं आणि दिवे होते. मिस्टर पॉट यांनी ‘स्टार्टर’ चे बटण दाबले. इंजिन आवाज करायला लागले. हा आवाज ’चिट्टी-चिट्टी बैंग-बैंग’ असा वाटत होता.

जेह्मी ने कहा “या कारचे हेच नाव आपण ठेवू,” जेह्मी म्हणाला. “आपण हिला ‘चिट्टी चिट्टी बैंग बैंग’ असे म्हणू या.



मिस्टर पॉट कार राजमार्गावर घेवून आले.लवकरच ‘चिट्टी-चिट्टी बैंग-बैंग’ शंभरच्या वेगात धावू लागली.

“आपण कुठे जात आहोत?” मिसेज़ पॉट ने विचारले, “समुद्र किनाऱ्यावर”.
मिस्टर पॉट म्हणाले,” तिथे आपण सहलीला जावू.”



पण सगळेच लोक समुद्री किनारी जात होते, मिस्टर पॉट यांना थांबावे लागले.
“सहलीसाठी ही चांगली जागा नाही, ”मिसेस पॉट म्हणाल्या.”आपल्याला इथे बसून वाट पहावी लागेल,” मिस्टर पॉट म्हणाले.





तेव्हाच कारचे एक बटण चमकू लागले. त्यावर लिहले होते “दाबा मला“.




“याला दाबून बघू काय होते ते,” जेह्मी म्हणाला. मिस्टर पॉट यांनी बटण दाबले.





इंजिनने थोडीशी गुरगुर केली, कार हलायला-डोलायला लागली. मग कार मधून विमानाला असतात तसे दोन पंख बाहेर आले. “ही तर जादू आहे!” जेमिमा ओरडली.

रस्त्यावरून ती हवेत उडायला लागली. “हो, जादू तर वाटते,” मिस्टर पॉट म्हणाले. ‘चिट्टी-चिट्टी बैंग-बैंग’



सगळ्या गाड्यांच्या वर ती उडायला लागली. आकाशात एखादा पक्षी उडतो तशी ती उडू लागली. समुद्र-तटाकडे ती उडू लागली.

‘चिट्टी-चिट्टी बैंग-बैंग’
समुद्र-तटा वरून उडाली.
तटावर लोकच लोक होते.
आपण पिकनिक कुठे
करायची. मिसेस पॉट
म्हणाल्या, ‘इथे तर
उतरण्यासाठी सुद्धा जागा
नाही.”

तेवढ्यात मिस्टर पॉट यांनी
हाताने कारचे चाक फिरवले.
कार आपली आप चालू लागली.



‘चिट्टी-चिट्टी बैंग-बैंग’
समुद्र-तटावरून दूर गेली.
जमिनीला तिने मागे सोडले आणि
ती समुद्राच्या वरून उडू लागली.





मग ती खाली येवू लागली, ती सरळ
लाटांकडे जावू लागली. “आपण
समुद्रात पडू!” मिसेस पॉट म्हणाल्या.
“आपण भिजून जावू.”

पण ‘चिट्टी-चिट्टी बैंग-बैंग’ ने
लाटांना टक्कर दिली नाही.
तिने तिचे पंख आत ओढून
घेतले आणि पाण्यावर उतरली.

ती समुद्र तटाकडे जावू लागली.
“हे फ्रान्स असेल, बघा तिथे
लाईट हाउस वर फ्रान्सचा झेंडा
लावलेला आहे.”



“इथे तर कोणीच नाही,” मिसेस पॉट म्हणाली.
“पिकनिक साठी ही चांगली जागा आहे.”
त्यांनी पिकनिकचे सगळे सामान काह्डले.
वाळूवर एक सतरंजी टाकली.



“इथे शोध घेण्यासाठी एक मोठी गुहा आहे,”
जेह्मीनर ओरडून सांगितले.
गुहा अंधारी आणि भीतीदायक होती.

“बघ!” जेमिमा ओरडली. तिथे एक सापळा होता, तो मागे पुढे हलत होता. हवेत त्याची हाडे खडखड करत होती.जेमिका घाबरून ओरडली.

मिस्टर और मिसेज़ पॉट यांनी तिचा आवाज ऐकला. ते 'चिट्टी-चिट्टी बैंग-बैंग' ला गुहेत घेवून गेले.

"हा खराखुरा सांगाडा नाही." मिस्टर पॉट म्हणाले. "हा तर नकली आहे. आपल्याला घाबरवण्यासाठी त्याला इथे ठेवलाय. कोणाला तरी वाटते की आपण गुहेत जावू नये, पण आपण गुहेत जाऊच."

अंधाऱ्या, भितीदायक गुहेत ते जात राहिले. त्यांच्या डोक्यावरून वटवाघळ उडू लागले.

खडकांतून पाणी टपकत होते, साप आणि कोळी बाहेर आले होते. “वर तिथे काय आहे?” जेहमी ओरडला.

तिथे एक मोठ्ठी खोली होती. त्यात बंदुका भरून ठेवल्या होत्या.तिथे डब्यांमध्ये बॉम्ब भरून ठेवले होते आणि दारुगोळा भरून ठेवलेले पिंप होते.” ही तर अजब गोष्ट आहे.” मिस्टर पॉट म्हणाले.



तिथे त्यांनी एक नोटीस वाचली.
ती भिंतीवर टांगली होती.
ते जवळ येवून वाचू लागले.



**सावधान!**

**“या सगळ्या बंदुका जुओ “राक्षस” च्या आहेत. त्यांना हात लावू नका!!”**





“मला जुओ राक्षसाची माहिती आहे,” जेह्मी म्हणाला.. “मी वर्तमानपत्रात त्याच्याबद्दल वर्तमानपत्रात वाचले आहे. तो एक लुटारू आहे.!” “ही त्याची गुप्त जागा असेल. ”जेमिमा म्हणाली.








“चला हा दारुगोळा उडवून टाकू”,
जेह्मी म्हणाला..
“हा चांगला विचार आहे,” मिसेस पॉट म्हणाल्या.
“मग आपण आपली पिकनिक करू शकू.”

मिस्टर पॉट यांनी वायरीचे एक टोक दारुगोळाच्या पिंपात ठेवले आणि दुसऱ्या टोकाला आग लावली. मग ते म्हणाले, “चला लवकर निघा इथून.”

सम्पूर्ण गुफ़ा उडून गेली.
ते गुहेतून निघत नाही तोच
’धडाम! धडाम!!’



तेवढ्यात एक मोठी काळी कार येवून पोहचली. त्यातून तीन माणसं खाली उतरली त्यांनी आपली बंदुक पॉट कुटुंबावर रोखली. “हात वर करा,” त्यातला एक ओरडला.

“तो ज्ओ ‘राक्षस’ आहे,” जेह्मी म्हणाला. “मी वर्तमानपत्रात त्याचा फोटो पाहिला आहे.”



दोन्ही मोठ्या माणसांचे हात बांधून टाका, ”तो जुओ राक्षस म्हणाला. त्याच्या साथीदारांनी मिस्टर आणि मिसेस पॉट यांना बांधून टाकले. चांगलं करकचून बांधलं.

ज्ओ ने जेह्मी आणि  जेमिमाला मोठ्या काळ्या कार मध्ये ढकलले. “आपण या मुलांना पारीसला घेवून जाऊ. त्यांना खंडणीसाठी त्यांना बंदी बनवून ठेवू,” तो म्हणाला.



मिस्टर आणि मिसेस पॉट उठले. पण ते आपले हात सोडू शकले नाही. त्यांनी मोठी काळी कार जातांना ते बघत राहिले.

जेह्मी आणि जेमिमा ने मोठ्या काळ्या कार मधून बाहेर पाहिले. जेमिमा रडू लागली. "आपण आपल्या आई वडिलांना परत कधीच बघू शकणार नाही," ती ओरडू लागली.



मग ‘चिट्टी-चिट्टी बैंग-बैंग’ खाकरली. ती जोर जोरात हळू लागली. मग गुणगुणू लागली.

मग तिने मिसेस पॉटला उठवलं आणि सीटवर बसवलं. मग तिने मिस्टर पॉटला उचललं.



मग ‘चिट्टी-चिट्टी बैंग-बैंग’ पेरिसच्या दिशेने रस्त्यावर चालू लागली. मिस्टर आणि मिसेस पॉटचे हात अजूनही बांधलेलेच होते.

पण ‘चिट्टी-चिट्टी बैंग-बैंग’ आपली आपणच चालत होती.ती शंभरच्या वेगाने धावत होती. ती ज्‌ओ ‘राक्षसा’च्या’ मोठ्या गाडीच्या मागे जात होती.

ते पारीसच्या जवळ येताच काळ्या
कारच्या जवळ येवू लागले.




दोन्ही कार पारीसच्या रस्त्यांवरून पळू लागल्या.
‘चिट्टी-चिट्टी बैंग-बैंग’ बड़ी, काळ्या कारच्या अगदी जवळ आली. ती काळ्या कारीला चावू लागली.

ज्ओ राक्षस आणि त्याचे साथीदार कार मधून खाली उतरून बाहेर आले. ते वर घराकडे पळायला लागले.



जेह्मी आणि जेमिमा 'चिट्टी-चिट्टी बैंग-बैंग' च्या कडे पळाले.
जेह्मी ने मिस्टर पॉटचे हात सोडले.
जेमिमा ने मिसेज़ पॉटचे हात सोडले.






ज्ओ राक्षस गोळ्या झाडायला लागला. पण ‘चिट्टी-चिट्टी बैंग-बैंग’ गोळ्यांना घाबरली नाही. ती दाणदाण जिना चढायला लागली. मिस्टर पॉट आणि जेह्मी तिच्या मागे धावत गेले.

“मी पोलिसांना फोन करते,” मिसेज़ पॉट म्हणाल्या.

‘चिट्टी-चिट्टी बैंग-बैंग’ दरवाज्यातून आत घुसली. ती खोलीतून आत शिरली. तिने जुओ राक्षस आणि त्याच्या सहकाऱ्यांना भिंतीतच दाबले.

तिने त्यांना एवढ्या जोरात दाबले की त्यांच्या हातातील बंदुका खाली पडल्या. पोलीस येईपर्यंत तिने त्यांना दाबून ठेवले.

पोलिसांनी जुओ आणि त्याच्या साथीदारांना हातकडी घातली. त्यांना सगळ्यांना एकत्र बांधून तुरुंगात घेवून गेले.






मग पोलिसांच्या प्रमुखाने पॉट परिवाराचे आभार मानले. “तुम्ही जुओला पकडून दिले,” त्याने म्हटले. “आम्ही तुमच्यासाठी काय करू शकतो?” “कृपया अशी जागा सांगा जिथे आम्ही पिकनिक करू शकतो,” मिसेज़ पॉट म्हणाल्या. “मला खूप भूक लागली आहे!”



पोलिसांच्या प्रमुखाने त्यांना एका सुंदर बागेत नेले. तिथे बसून सगळ्यांनी खाल्ले. “पीनट बटर आपल्याला आवडले असेल,” मिसेज़ पॉट पोलिसाला म्हणाल्या.



‘चिट्टी-चिट्टी बैंग-बैंग’ ने पण खूप खाल्ले. फ्रांसच्या पोलिसांनी तिला पेट्रोल पाजले, पाणी पाजले. तिला इतके धुतले की ती नवीन दिसायला लागली.

त्या रात्री पॉट परिवार
आणि ‘चिट्टी-चिट्टी बैंग-बैंग’
घरी आले.

“घरी गेल्यावर किती छान वाटेल,”
जेमिमा म्हणाली.
“नक्कीच,” जेह्मी म्हणाला, “पण कोणाला
माहित घरी पोहचण्याच्या आधी काय होणार
आहे ते?”

